राज्यात सुरू असलेल्या संस्थेतील व्यावसायिक पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांस अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून शासन मान्यता देणेबाबत......
छत्रपती शाहू इन्स्टिटयूट ऑफ बिझनेस एज्युकेशन ॲन्ड रिसर्च, कोल्हापूर

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. टीईएम-२०१७/प्र.क्र.९५/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १५ मे, २०१७

**संदर्भ :** १) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.वेस्टर्न/१-२८०९६५२७३७/२०१६/EOA, दि.२५.०४.२०१६
२) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय यांचे पत्र क्रमांक २(३)/एनजीसी/(१/२०१७)/१९३, दिनांक १४.०२.२०१७

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन-१ येथील पत्रान्वये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी छत्रपती शाहू इन्स्टिटयूट ऑफ बिझनेस एज्युकेशन अँड रिसर्च,कोल्हापूर या संस्थेत चालविण्यात येणारे, M.B.A -१८० प्रवेश क्षमता, M.B.A (Environment)- ६० प्रवेशक्षमता व M.C.A -६० प्रवेश क्षमता, हे पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम सुरू ठेवण्यास मान्यता दिली आहे. सदर संस्था स्वायत्त असून शिवाजी विद्यापीठ,कोल्हापूर यांचेशी कायमस्वरूपी संलग्नित आहे. तथापि, संस्थेतील एम.बी.ए. अभ्यासक्रमास शासन पत्र (तत्कालिन शिक्षण व रोजगार विभाग) दि.१९.०३.१९८३ च्या पत्रान्वये मान्यता देण्यात आली असली तरी सदर आदेशात प्रवेशक्षमता नमूद करण्यात आली नसल्याने व एम.सी.ए. अभ्यासक्रमास अद्याप शासन मान्यता नसल्याने तसेच महाराष्ट्र विनाअनुदानित खाजगी व्यावसायिक शैक्षणिक संस्था (प्रवेश व शुल्क यांचे विनियमन) अधिनियम, २०१५ नुसार राज्यातील सर्व व्यावसायिक शिक्षण संस्थांतील प्रवेश केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेव्दारे होणे अनिवार्य असल्याने उपरोक्त संदर्भाधीन-२ येथील पत्रान्वये संचालक, तंत्र शिक्षण यांनी शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने सदर अभ्यासक्रमांना शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त संदर्भाधीन-१ येथील पत्रान्वये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संदर्भाधीन-२ अन्वये संचालक, तंत्र शिक्षण यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार छत्रपती शाहू इन्स्टिटयूट ऑफ बिझनेस एज्युकेशन अँड रिसर्च,विद्यापीठ रोड, कोल्हापूर-४१६ ००४ या संस्थेत चालविण्यात येणा-या खालील विवरणपत्रात नमूद पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांना, विवरणपत्राखाली नमूद अटी व शर्तींच्या तसेच संस्थेने अखिल भारतीय तंत्र शिक्षण

परिषद,नवी दिल्ली यांचेकडून सन २०१७-१८ साठी Extension of Approval (EOA) प्राप्त करण्याच्या अधीन राहून, शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अभ्यासक्रमाचे नाव | प्रवेशक्षमता |
|---|---|---|
| १. | Masters in Business Administration | १८० |
| २. | Masters in Business Administration (Environment ) | ६० |
| ३. | Masters in Computer Application | ६० |

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेक्षक्षमता वर नमूद केल्याप्रमाणे राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेने विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदव्युत्तर अभ्यासक्रमांचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

११) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१२) ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतिम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५१५१२१६५६३६०८ असा आहे. सदर शासन निर्णय हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.Kiran Patil Digitally signed by Dr.Kiran Patil Date: 2017.05.16 14:11:02 +05'30'

**( डॉ.किरण पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, पुणे (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ ,शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर. (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. संचालक, छत्रपती शाहू इन्स्टिटयूट ऑफ बिझनेस एज्युकेशन अँड रिसर्च, विद्यापीठ रोड,कोल्हापूर-४१६ ००४
५. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
६. निवड नस्ती/तांशि-४.